**सेवानिवृत्त होणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांना निवृत्तिवेतनविषयक लाभ वेळेवर अदा करण्याबाबत.**

---

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग

शासन परिपत्रक, क्रमांक:सेनिवे- १००४/१९२/सेवा-४
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : १३ ऑगस्ट २००४.

पहा:- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.सेनिवे-१०८५/२०३७-ब/८७/सेवा-४, दिनांक २९.७.१९८६.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.सेनिवे-१०९०/प्र.क्र.३४१/सेवा-४, दिनांक ६.३.१९९१.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.सेनिवे-१०९२/७७/सेवा-४, दिनांक १.४.१९९२.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.सेनिवे-१०९३/२४/सेवा-४, दिनांक १५.४.१९९३.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.सेनिवे-१०९३/८५/सेवा-४, दिनांक ६.१०.१९९३.
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.सेनिवे-१०९७/२७/सेवा-४, दिनांक ३१.५.१९९७.
७)शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.सेनिवे-१०००/१२०/सेवा-४, दिनांक १८.४.२०००.

## परिपत्रक

सेवानिवृत्त होणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांना निवृत्तिवेतनविषयक लाभ वेळीच प्रदान केले जावेत यासाठी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ च्या प्रकरण १० मध्ये वेळापत्रक विहित करण्यात आलेले आहे. सदरहू वेळापत्रकाचे पालन काटेकोरपणे करण्याबाबत या विभागाने वर नमूद केलेल्या आदेशांद्वारे विभाग/कार्यालय प्रमुखांना वेळोवेळी सूचना दिलेल्या आहेत. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आलेले आहे की, कार्यालय प्रमुखांकडून निवृत्तिवेतन व उपदान प्रत्यक्ष देण्याच्या व प्राधिकृत करण्याच्या विहित कार्यपध्दतीचे पालन करण्यात न आल्याच्या परिणामी बऱ्याच प्रकरणी सेवानिवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना निवृत्तिवेतनविषयक लाभ विलंबाने प्रदान केले जात आहेत. अशाप्रकारे निवृत्तिवेतनविषयक लाभांचे विलंबाने प्रदान केले गेल्यामुळे निवृत्तिवेतनधारकांना आर्थिक त्रास सोसावा तर लागतोच, शिवाय विलंबित रकमांवर व्याज प्रदान करावे लागत असल्यामुळे त्याचा आर्थिक भार शासनास सहन करावा लागतो. काही प्रकरणी निवृत्ति वेतनविषयक लाभांचे प्रदान विलंबाने होत असल्याच्या प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने देखील नाराजी व्यक्त केलेली आहे. या सर्व बाबींची शासनाने गंभीर दखल घेतली आहे.

२. याद्वारे सर्व विभाग/कार्यालय प्रमुखांना पुन्हा असे निदेश देण्यात येत आहेत की, त्यांनी निवृत्तिवेतनधारकांना निवृत्तिवेतनविषयक लाभ विहित वेळेत प्रदान केले जातील यादृष्टिने सर्वतोपरी दक्षता घ्यावी. शासनाने यापूर्वी वर नमूद केलेल्या परिपत्रकाद्वारे वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे/आदेशांचे काटेकोरपणे पालन करावे. निवृत्तिवेतनविषयक कागदपत्रे महालेखापालांच्या कार्यालयाकडे प्रलंबित असल्यास त्या कार्यालयाकडे सातत्याने पाठपुरावा करावा. एकंदरीत निवृत्तिवेतनधारकांना निवृत्तिवेतनविषयक लाभ प्रदान करण्यास विलंब होणार नाही याची दक्षता घेण्याची जबाबदारी विभाग/कार्यालय प्रमुखांची आहे. ही जबाबदारी व्यवस्थितपणे पार न पाडल्यास त्यांचेविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी. त्याशिवाय त्यांच्या गोपनीय अहवालात **"निवृत्तिवेतनाची प्रकरणे निकालात काढण्यास अक्षम्य दिरंगाई झाल्याने शासनास व्याजापोटी आर्थिक झळ बसण्यास जबाबदार आहेत."** - अशाप्रकारची नोंद घेण्यात यावी.

३. हे आदेश सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग/कार्यालयांच्या निदर्शनास आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**शुभदा कारेकर**
**शासनाच्या उप सचिव**

H-605 (13000+40-8-04) 1

क्र.मा.प.

प्रति,

प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती),
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (२५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (५० प्रती),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
उप-मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १० प्रती),
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
सर्व उपकोषागार अधिकारी

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मंत्रालयासमोर, मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हाधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (प्रत्येकी ५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,

सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),

सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

*पत्राद्वारे.